**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शीर्षांतर्गत निधी वितरण (लेखाशीर्ष २२०२ १९०१, २२०२ १९४८ व २२०२ एच ९७३-वेतन)**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः **बीयुडी-२०२३/प्र.क्र.०४/का-६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ३० ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
२) आदिवासी विकास विभाग शा.नि. क्र.बीयुडी-२०२३/प्र.क्र.०४/का-६, दि.१२.०४.२०२३, दि.१८.०५.२०२३, दि.३०.०६.२०२३ व दि.०८.०८.२०२३.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची नस्ती क्र.अनुवि-४९२३/ प्र.क्र.६७/अर्थसंकल्प.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत शालेय शिक्षण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान, अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान व सैनिक शाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य या योजनांसाठी संदर्भाधीन क्र.२ अन्वये एकूण अर्थसंकल्पित तरतुदींच्या ४२ टक्के मर्यादेत निधी वितरीत करण्यात आला आहे.

त्यानंतर आदिवासी क्षेत्रातील अशासकीय माध्यमिक शाळांमधील कर्मचाऱ्यांचे वेतन अदा करण्याकरीता २० टक्के मर्यादेत निधी वितरीत करण्याबाबत शालेय शिक्षण विभागामार्फत संदर्भाधीन क्र.३ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने अर्थसंकल्पित तरतुदींच्या एकूण ६० टक्के मर्यादेत निधी वितरणास दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०२३-२४ अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२०२ - सर्वसाधारण शिक्षण या मुख्य लेखाशिर्षांतर्गत सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान, अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान व सैनिक शाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य या योजनांसाठी वित्त विभागाच्या मान्यतेने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदींतून एकूण ६० टक्के मर्यादेत खालीलप्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु. लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | अर्थसंकल्पित तरतूद सन २०२३-२४ | यापूर्वी वितरीत निधी | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान | २२०२ १९०१ | ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन) | ७५००.०० | ३१५०.००० (४२%) | १३५०.०० (१८%) |
| २ | अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान | २२०२१९४८ | | ४२२.९५ | १७७.६३९ (४२%) | ७६.१३१ (१८%) |
| ३ | सैनिक शाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य | २२०२एच९७३ | | २५००.०० | १०५०.००० (४२%) | ४५०.००० (१८%) |
| | **एकूण** | | | **१०४२२.९५** | **४३७७.६३९** | **१८७६.१३१** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.१८७६.१३१ लाख (अक्षरी रुपये अठरा कोटी शहात्तर लाख तेरा हजार शंभर रुपये फक्त) इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७७९/२०२३/व्यय-१४, दि.१८.०८.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८१७१७०८३८८४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.08.30 17:37:44 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.